**केंद्र शासनाच्या निदेशानुसार “महाराष्ट्र राज्य विवाद धोरण” लागू करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

विधि व न्याय विभाग,
शासन निर्णय क्रमांकः सीटीए-२०१६/प्र.क्र. ९४/ का.१९
मादामा कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१४.

## प्रस्तावना :-

भारतीय संविधानात राष्ट्रीय न्यायव्यवस्थेस महत्व देण्यात आले आहे. न्यायव्यवस्था ही पारदर्शक असावी, न्यायालयीन दावे त्वरित निकाली निघावेत, तसेच प्रलंबित दावे निकाली काढताना होणारा विलंब टाळता यावा, या उद्देशाने राज्यासाठी प्रभावी धोरण तयार करण्याचे केंद्र शासनाचे निदेश आहेत. तसेच, नॅशनल लिगल मिशनने निश्चित केल्यानुसार न्यायालयीन प्रकरणांचा सरासरी प्रलंबन कालावधी १५ वर्षावरुन ३ वर्षापर्यत कमी करता यावा याकरिता, **“महाराष्ट्र राज्य विवाद धोरण”** लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या सर्व बाबी विचारात घेऊन, शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

राष्ट्रीय विवाद धोरणास आधारभूत मानून महाराष्ट्र राज्यातील विविध न्यायालये व न्यायाधिकरणांमधील ज्या प्रकरणांमध्ये राज्य शासन व त्याची अभिकरणे प्रधान पक्षकार आहेत अशा पक्षकाराचे कार्यक्षम व जबाबदार पक्षकारामध्ये रुपांतर करण्यासाठी तसेच सदर प्रकरणांच्या जलद निपटाऱ्याकरिता **“महाराष्ट्र राज्य विवाद धोरण - २०१४”** तयार करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्यातील न्यायव्यवस्थेचे बळकटीकरण करण्याकरिता सदर धोरण राज्यात लागू करण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

## राज्य विवाद धोरणाची प्रमुख उद्दिष्टे :-

(एक) उच्च न्यायालयासह विविध न्यायालयांमधील, विवादातील मध्यवर्ती मुद्यांवर लक्ष केंद्रित करुन त्यांचे संलग्नशील, समन्वित आणि कालमर्यादित पध्दतीने व्यवस्थापन करणे.

(दोन) उच्चस्तरीय समितीमार्फत सर्व प्रलंबित प्रकरणांचे पुनर्विलोकन करणे आणि विविध न्यायालयांपुढे प्रलंबित असलेली मुदतबाहय, निरुपयोगी आणि परिणामशून्य प्रकरणे निकाली काढणे,

(तीन) शासनाच्या संदर्भातील कोणतेही अपील, रिट अर्ज, विशेष अनुमती याचिका दाखल करण्यापूर्वी प्रकरणांची काटेकोरपणे छाननी करण्याकरिता सक्षम यंत्रणा व मार्गदर्शक तत्वे उपलब्ध करुन देणे;

(चार) न्यायालयीन कामकाज पाहणाऱ्या शासकीय अभिकरणांच्या कामकाजात सुधारणा करुन जबाबदारीची संकल्पना मांडणे;

(पाच) दुय्यम न्यायालयांच्या पायाभूत सोयीसुविधांमध्ये सुधारणा करुन अतिरिक्त विशेष न्यायालये, जलदगती न्यायालये (फास्ट ट्रॅक कोर्ट) स्थापन करुन त्यांच्यामार्फत प्रकरणांचा जलदगतीने निपटारा करणे;

## राज्य विवाद धोरणाच्या प्रमुख तरतुदी

१. राज्य विवाद धोरणान्वये अधोरेखित केलेली उद्दिष्टे साध्य करण्याकरिता, सामुहिक धोरणात्मक निर्णय घेऊन त्यांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरिता कार्यतंत्रविषयक योजना तयार करण्यात येईल. त्यानुसार राज्यस्तरीय/विभागस्तरीय/जिल्हास्तरीय अधिकार प्रदत्त समित्यांची स्थापना करण्यात येत असून त्यांची रचना व कर्तव्ये सोबत जोडलेल्या राज्य विवाद धोरणामध्ये नमूद करण्यात आली आहेत.

२. शासनाचे विभाग व सरकारी वकील यांच्यामधील योग्य समन्वयासाठी शासनाचा प्रत्येक विभाग, अवर सचिवाच्या दर्जापेक्षा कमी नसलेल्या किमान एका मध्यस्त (Nodal) अधिकाऱ्याची नियुक्ती करेल. मध्यस्त अधिकारी क्रियाशील प्रकरण व्यवस्थापनासाठी जबाबदार असेल.

**३.** अनावश्यक स्थगिती / तहकुबी टाळण्यासाठी, प्रशासकीय विभाग व सरकारी वकील यांच्यामध्ये माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन, योग्य आंतरसंवादाची (इंटरफेस) तरतूद करण्यात येत आहे. न्यायालयीन कामकाजाकरिता जिल्हा न्यायालय, उच्च न्यायालय आणि सर्वोच्च न्यायालय यांच्या प्रकरण माहिती प्रणालीवर उपलब्ध असलेल्या माहितीचा उपयोग करुन न्यायालयीन दाव्यासंबंधातील दैनंदिन कार्यवाही व घडामोडी याबाबतची माहिती सर्व संबंधितांना करुन देता येईल.

**४.** अंतरिम एकतर्फी आदेशांच्याविरुध्द अपील दाखल करण्यापूर्वी एकतर्फी आदेश रद्द करण्याकरिता एखादा अर्ज दाखल करणे योग्य ठरेल किंवा कसे याचा साकल्याने विचार करावा.

**५.** ज्या दाव्यांमध्ये राज्य शासन एक पक्षकार आहे असे दावे, पर्यायी तंटा निवारण (ADR) यंत्रणा, लोक अदालत, विशेष मोहीम, सकाळची / सायंकाळची न्यायालये, विशेष न्यायालये किंवा न्यायाधिकरणे इत्यादी मार्फत सोडविण्यासाठी, संबंधित प्रशासकीय विभाग स्तरीय समिती / जिल्हास्तरीय समिती, यांनी प्रयत्न करावे.

**६.** सत्र न्यायालयात चालविण्यात येणाऱ्या फौजदारी अपराधांसाठी अतिरिक्त जलदगती न्यायालये स्थापन करता यावीत या करिता शासन एक योजना तयार करेल. तसेच संवेदनशील प्रकरणे हाताळण्यासाठी विशेष न्यायालयांची स्थापना करण्यात येईल.

महाराष्ट्र राज्य विवाद धोरणाची मराठी व इंग्रजी प्रत अनुक्रमे परिशिष्ट “अ” व “ब” मध्ये सोबत जोडली आहे. सर्व प्रशासकीय विभाग, विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांनी सदर धोरणातील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१४०८२७१७२३५८८२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAYEED MOHAMMAD AKRAM

Digitally signed by SAYEED MOHAMMAD AKRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY,CID - 917947, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAYEED MOHAMMAD AKRAM
Date: 2014.09.19 12:35:42 +05'30'

**( एम. ए. सईद )**
सचिव व विधि परामर्शी
विधी व न्याय विभाग

प्रती,

१. राज्यपालांचे सचिव.
२. मुख्यमंत्र्याचे व उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
६. सचिव, विधि व न्याय मंत्रालय,भारत सरकार,जैसलमेर हाऊस,२६, मानसिंग रोड,नवी दिल्ली-११
७. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन विभाग,
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
११. अभियोग संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१३. प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१६. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१७. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद

१९. सर्व विभागीय महसूल आयुक्त,
२०. सर्व जिल्हाधिकारी
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२२. सरकारी मुखत्यार, उच्च न्यायालय, मुंबई.
२३. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी न्यायालय व सत्र न्यायाधीश, मुंबई
२४. मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई / पुणे / नागपूर.
२५. प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय,पुणे/ मुंबई/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती/ अकोला/ ठाणे/ नाशिक/ सोलापूर/कोल्हापूर/नांदेड
२६. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई.
२७. सर्व जिल्हा व सत्र न्यायाधिश. जिल्हा न्यायालय व फौजदारी न्यायालय
२८. प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय व ग्राम न्यायालय, सेवाग्राम जि.वर्धा, /राळेगणसिध्दी जि. अहमदनगर/ सारवेली जि. रायगड,/ गडचांदूर जि. चंद्रपूर /निजामपूर जि. धुळे/ पाली जि. रत्नागिरी/ कासारखेडा,जि. नांदेड/जव्हार जि. ठाणे /उरळीकांचन जि. पुणे / वरणगांव जि.जळगांव/कोरची, जि. गडचिरोली
२९. प्रमुख न्यायाधीश, केंद्रीय गुन्हे अन्वेषण विशेष न्यायालय, मुंबई/ पुणे / अमरावती / नागपूर
३०. संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर.
३१. सह संचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र व प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि. ठाणे.
३२. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य मुंबई.
३३. सहयोगी महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३४. सरकारी वकील, उच्च न्यायालय ( मूळ शाखा/ अपील शाखा/रिट शाखा), मुंबई.
३५. सरकारी वकील, उच्च न्यायालय, नागपूर, औरंगाबाद.
३६. सरकारी वकील, नगर दिवाणी न्यायालय, मुंबई.
३७. सरकारी वकील, लघुवाद न्यायालय, मुंबई/पुणे /नागपूर
३८. सरकारी वकील कार्यालय, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
३९. सरकारी अभियोक्ता, बृहन्मुंबई, मुंबई.
४०. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई.
४१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विधी आयोग, मुंबई. (अवर सचिव का.१९ विधी व न्याय विभाग, मंत्रालय)
४२. सर्व सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई /नागपूर / औरंगाबाद.
४३. सर्व उप सचिव /अवर सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय.
४४. वित्त विभाग (अर्थसंकल्प -११, व्यय-६, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
४५. सर्व कार्यासन अधिकारी , विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४६. निवड नस्ती.

# परिशिष्ट - अ
# महाराष्ट्र राज्य विवाद धोरण

## प्रस्तावना

राष्ट्रीय विवाद धोरणानुसार वाटचाल करीत असताना महाराष्ट्र राज्याचे राज्य विवाद धोरण एक पुढचे पाऊल आहे. या विवाद धोरणाच्या रुपरेषेमध्ये, शासनामुळे उद्भवलेल्या विवादांच्या संबंधात, न्यायव्यवस्था, पोलीस यंत्रणा,शासनाचे विभाग व अभिकरणे यांच्यावरील भार कमी करणे, अनुत्पादक विवादावरील टाळता येण्याजोगा खर्च वाचविणे, विवाद कमी करणे या दृष्टीने राज्य शासन किंवा त्यांची अभिकरणे यांनी अनुसरावयाची कार्यतंत्रे याबाबतची स्थूल अशी मार्गदर्शक तत्वे आहेत.

राष्ट्रीय विवाद धोरणामध्ये राज्य शासन हा एक कार्यक्षम व जबाबदार पक्षकार असावा, असे अपेक्षित आहे. राज्य शासनाने सक्तीचा पक्षकार होणे हे थांबवायलाच पाहिजे. राज्य शासन नफेखोरीचा हेतू असलेल्या अन्य खाजगी पक्षकारासारखे वागू शकत नाही. विद्यमान साधनसंपत्ती त्याचबरोबर नव्याने निर्माण केलेली साधनसंपत्ती याचा इष्टतम वापर करुन योग्य प्रकरण व वेळ व्यवस्थापन यामार्फत प्रभावी विवादाचे ध्येय साध्य करण्यात येईल. अनावश्यक विवादावर निर्बंध घालणे त्याचबरोबर शासनाच्यावतीने न्यायालयापुढे योग्यपणे व प्रभावीपणे खटला दाखल करण्याची व त्याची मांडणी करण्याची सुनिश्चिती करणे हे धोरणाचे उद्दिष्ट आहे.

राज्य विवाद धोरणाचा मूळ हेतू हा न्यायालयामधील शासकीय विवाद कमी करणे हा आहे. त्याचप्रमाणे विविध यंत्रणांचा अवलंब करुन न्यायालयामध्ये प्रलंबित असणाऱ्या प्रकरणांचे प्रमाण कमी करणे जेणेकरुन न्यायालयाचा बहुमूल्य वेळ गुणवत्तापूर्ण प्रकरणे सोडविण्यात देता येईल आणि सरासरी प्रलंबन कालावधी १५ वर्षांवरुन ३ वर्षापर्यंत कमी करण्याचे राष्ट्रीय विधि मिशनने निश्चित केलेले ध्येय गाठता येईल.

## २. साध्य करावयाची उद्दिष्टे

(एक) उच्च न्यायालयासह विविध न्यायालयांमधील प्रकरणांची प्रलंबितता कमी करणे;

(दोन) विवादातील मध्यवर्ती मुद्यांवर लक्ष केंद्रित करुन त्यावर प्रभावीपणे विचार करणे ;

(तीन) विवादाची संलग्नशील, समन्वित आणि कालमर्यादित पध्दतीने व्यवस्था करणे व तो चालविणे;

(चार) चांगली प्रकरणे जिंकली जावित व निरर्थक प्रकरणे विनाकारण जतन करुन ठेवली जाणार नाहीत याची सुनिश्चिती करणे ;

(पाच) विविध न्यायालयांपुढे राज्य शासनाच्या विविध विभागांच्या प्रलंबित असणाऱ्या प्रकरणांच्या पुनर्विलोकनासाठी धोरण तयार करणे;

(सहा) उच्चस्तरीय समितीमार्फत सर्व प्रलंबित प्रकरणांचे पुनर्विलोकन करणे आणि विविध न्यायालयांपुढे प्रलंबित असलेली मुदतबाहय, निरुपयोगी आणि परिणामशून्य प्रकरणे निकालात काढण्यासाठी धोरण तयार करणे;

(सात) शासनाच्या संदर्भातील कोणतेही अपील, रिट अर्ज, विशेष अनुमती याचिका दाखल करण्यापूर्वी प्रकरणांची काटेकोर छाननी करण्यासाठी यंत्रणा व मार्गदर्शक तत्वे उपलब्ध करुन देणे;

(आठ) केवळ विवादासाठी म्हणून विवादाचा अवलंब न करणे;

(नऊ) शासनाच्या विवादांमध्ये चुकीचा व तांत्रिक युक्तिवाद करण्याचे टाळणे;

(दहा) खटला चालविणाऱ्या शासनाच्या अभिकरणांच्या संपूर्ण कामकाजात सुधारणा करणे;

(अकरा) शासनाच्या विवादाच्या बाबतीत जबाबदारीची संकल्पना मांडणे;

(बारा) तहकुबी टाळणे;

(तेरा) दुय्यम न्यायालयांच्या पायाभूत सोयीसुविधांमध्ये सुधारणा करणे;

(चौदा) प्रकरणांचा जलदगतीने निपटारा करण्यासाठी विशेष न्यायालये, जलदगती न्यायालये (फास्ट ट्रॅक कोर्ट) निर्माण करणे;

(पंधरा) पर्यायी वाद निवारण यंत्रणेमार्फत प्रकरणे निकालात काढण्यासाठी प्रोत्साहन देणे;

(सोळा) दिवाणी व फौजदारी विवादासंबंधात विधायक दृष्टीकोन स्वीकारणे.

## ३. संनियंत्रण व पुनर्विलोकन यासाठी नवीन समित्यांची स्थापना करणे..

प्रलंबित प्रकरणांच्या एकूण संख्येपैकी बऱ्याच मोठया प्रमाणातील प्रकरणांमध्ये राज्य शासन एक पक्षकार म्हणून आहे. त्यासाठी राज्य शासनाची विवाद यंत्रणा बळकट करणे आवश्यक आहे. राज्य विवाद धोरणान्वये अधोरेखित केलेली उद्दिष्टे साध्य करण्यासाठी, सामूहिक धोरणात्मक निर्णय घेणे व त्या निर्णयांची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे यासाठी कार्यतंत्र विषयक योजना तयार करण्याची गरज आहे. राज्य विवाद धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी पुढीलप्रमाणे समित्या व अधिकारी असतील:-

१. राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समिती
२. विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती
३. जिल्हा स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती
४. मध्यस्त (नोडल) अधिकाऱ्यांची नियुक्ती

### ३.१ राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समिती

#### ३.१.१ राज्यस्तरीय समितीची रचना.

राज्य शासनाचे मुख्य सचिव राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीचे प्रमुखपदी असतील आणि त्यात गृह, महसूल, सामान्य प्रशासन, नगर विकास, विधि व न्याय या विभागांचे सचिव, अभियोग संचालक आणि मुख्यमंत्री नामनिर्देशित करतील अशा अन्य सचिवांसह दहापेक्षा अधिक नसतील अशा सदस्यांचा समावेश असेल. प्रधान सचिव व विधि परामर्शी, महाराष्ट्र शासन हे राज्यस्तरावरील अशा अधिकार प्रदत्त समितीचे सदस्य-सचिव असतील.

#### ३.१.२ राज्यस्तरीय समितीची कर्तव्ये

(१) जिल्हास्तरीय व विभागस्तरीय अधिकार प्रदत्त समित्यांनी सुचविलेल्या सूचना, शिफारशी व केलेल्या तक्रारी विचारात घेणे हे अधिकार प्रदत्त समितीचे कर्तव्य व जबाबदारी असेल. समिती या विषयावर विचारविनिमय करील व या विषयांच्या संबंधात समुचित उपाययोजना करील.

(२) समिती, सर्व जिल्हास्तरीय अधिकार प्रदत्त समित्यांचे मासिक, त्रैमासिक व वार्षिक अहवाल विचारात घेईल आणि समितीला यासंबंधात योग्य वाटतील असे उपाय योजण्याच्या दृष्टीने त्यांनी केलेल्या सूचना व शिफारशींसह एकत्रित अहवाल तयार करील.

(३) ज्या वेळी कोणत्याही प्रकरणात वादखर्च देण्यात येईल त्या वेळी विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती, असा खर्च का देण्यात आला याबाबत कारणे नमूद करुन समितीला त्यांचा अहवाल सादर करील. विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती हा वादखर्च लादण्यास ज्यांच्यामुळे भाग पडले त्यासाठी जबाबदार असलेल्या कसूरदार व्यक्तींचा शोध घेऊन त्यांची नावे निश्चित करील. राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समिती याबाबतीत योग्य ती कारवाई करण्याची शिफारस करील.

(४) समिती, सर्व प्रलंबित प्रकरणांचे व गुणवत्तापूर्ण प्रकरणांमधून क्षुल्लक व निरुपयोगी प्रकरणे गाळून अशा प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्यास देखील जबाबदार असेल.

(५) जिल्हा स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती, आवश्यक बाब म्हणून काही विशिष्ट नावांची / क्रमांकांची/ प्रवर्गांतील प्रकरणे लोकअदालत किंवा पर्यायी विवाद यंत्रणा यापैकी एका यंत्रणेमार्फत शीघ्रतेने निकालात काढण्यासाठीच्या शिफारशींसह विधि विभागाला अहवाल सादर करील.

(६) भविष्यात तत्सम विवाद निर्माण होणे टाळण्याकरिता, त्यांचे प्रमाण कमी करण्याकरिता ते निर्माण होऊ नयेत किंवा ते कमी व्हावेत याद्दष्टीने प्रकरणपरत्वे विविध न्यायालये, मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय यांनी दिलेले विविध निर्देश, आदेश, (निकाल) न्यायनिर्णय किंवा अधिघोषणा समिती विचारात घेईल, असे पुनर्विलोकन एकतर अर्धवार्षिक किंवा वार्षिकरितीने करता येईल.

(७) समितीला जिल्हा स्तरावरील अधिकार प्रदत्त समित्यांचे अहवाल विचारात घेता येतील आणि तत्सम विवाद टाळण्यासाठी, त्यांचे प्रमाण कमी करण्यासाठी, ते उद्भवू नयेत किंवा ते कमी व्हावेत याद्दष्टीने विवादाच्या संबंधातील माहिती व त्यावरील निकाल यांचे आणखी विश्लेषण करता येईल. समितीला विशिष्ट क्षेत्रातील, प्रदेशातील, विषयातील, वर्गातील, गटातील वारंवार होणाऱ्या चुका, दोष, उणिवा किंवा विसंगती टाळण्यासाठी किंवा सुधारण्यासाठी किंवा तत्सम कारणांसाठी संपूर्ण राज्याच्या विवादांच्या संबंधातील माहितीचे विश्लेषण करता येईल. समिती राज्यातील किंवा यथास्थिती, कोणत्याही जिल्हयातील विवादांच्या माहितीवर आधारित त्यांच्या शिफारशी / सूचना किंवा मत देण्यासंबंधातील वार्षिक अहवाल तयार करील.

(८) समिती, आव्हानित वाद, विषय, प्रदेश, क्षेत्र, गट, कर्मचा-यांचा प्रवर्ग, विवादाचा प्रकार, विवादाचा कालावधी, विभाग, मागासवर्ग, महिला, बालक, धोरणे व तत्सम विषयक विवाद याआधारे करण्यात आलेल्या विवादाच्या माहितीची वर्गवारी करण्यासाठी शासकीय अधिवक्ते (वकील) किंवा संबंधित पक्षकार विभागांनी सादर केलेली माहिती गोळा करण्यासाठीचा नमुना / टेम्प्लेट/ ऑनलाईन प्रपत्र विहित करील. समिती विभागीय स्तरावरील व जिल्हा स्तरावरील अधिकार प्रदत्त समित्यांनी सादर करावयाच्या मासिक, त्रैमासिक किंवा वार्षिक अहवाल यासाठीचे नमुनेदेखील विहित करील. समिती जिल्हा किंवा तालुका न्यायालयातील शासकीय अधिवक्ते (वकील) यांच्याकडे उपलब्ध असलेल्या फायलींची तपासणी करण्याची पध्दती व रीत विहित करील. समिती, संबंधित विभागाचे किंवा जिल्हयांचे ऑनलाईन अहवाल तयार करण्यासाठी माहिती तंत्रज्ञान वापरुन एक यंत्रणा तयार करण्याची योजना तयार करील / सुचवील जेणेकरुन अहवाल सादर करण्याच्या दीर्घ कार्यपध्दतीचे स्वरुप भविष्यात कमी होऊ शकेल.

(९) समिती, वेब-पोर्टल्स, ई- गव्हर्नन्स, व्हिडीओ कॉन्फरन्सिंग, डिजिटल सिग्नेचर्स वापरुन माहितीचे आदानप्रदान यासारख्या माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन, अन्य इलेक्ट्रॉनिक्स उपकरणे व साधन यंत्रे (Gadgets) यांचा वापर करुन सर्व आवश्यक ते निर्णय घेईल- जेणेकरुन नेहमीची कार्यपध्दती अनुसरल्यामुळे होणारा विलंब कमी होईल तसेच त्यामुळे राज्य शासनाच्या विवाद प्रकियेचे कामकाज अधिक पारदर्शक, प्रतिसादक्षम व जबाबदार देखील होईल.

(१०) समिती लवाद नेमण्याच्या संबंधातील बाबींना अंतिम रुप देईल. ती, वेळोवेळी लवादांच्या सूचीत सुधारणा करील.

**३.२ विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती**

**३.२.१ (विभागीय स्तरावरील) समितीची रचना**

विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समितीमध्ये, संबंधित विभागाचे अतिरिक्त मुख्य सचिव, प्रधान सचिव आणि संबंधित विभागाचा मध्यस्त (नोडल) अधिकारी यांचा समावेश असेल. अतिरिक्त मुख्य सचिव किंवा प्रधान सचिव आवश्यक असल्यास, अतिरिक्त सदस्याला निमंत्रित करतील. संबंधित विभागाचा मध्यस्त (नोडल) अधिकारी हा समितीचा सदस्य-सचिव असेल.

**३.२.२ विभागीय स्तरावरील समितीची कर्तव्ये**

(१) विभागीय स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती सर्व प्रकरणांची जी सूची तयार करील तिची विषय, प्रदेश, क्षेत्र, गट, कर्मचाऱ्यांचा प्रवर्ग, विवादाचा प्रकार, विवादाचा कालावधी, मागासवर्ग, महिला, बालक, धोरणे व तत्सम इत्यादि यांच्या आधारे वर्गवारी करेल. आणि ती, संबंधित विभागाने किंवा त्यांच्या विरोधात दाखल करण्यात आलेल्या सर्व विवादांचे संनियंत्रण करील आणि कोणत्याही प्रस्तावित उपाययोजना किंवा कोणतीही कारवाई करण्यासाठी राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समितीला सूचना किंवा शिफारशी करील. समिती दहा वर्षे, पाच वर्षे व तीन वर्षांपेक्षा अधिक जुन्या प्रकरणांचे व ती प्रकरणे प्रलंबित राहण्यामागची कारणे यांचे सखोलपणे संनियंत्रण करील. समिती विभागाच्या मध्यस्त (नोडल) अधिकाऱ्यांना या प्रकरणांचा लवकरात लवकर निर्णय लावण्यासाठी किंवा ती निकालात काढण्यासाठीचे निर्देश देईल.

(२) ज्यामध्ये न्यायालयाने सामाईक त्रुटी, दोष, विसंगती किंवा चूका दर्शवून देणारे निदेश/ न्यायनिर्णय/ आदेश दिले आहेत असे भविष्यातील एक सारखेच विवाद टाळण्यासाठी समिती अशा प्रकरणांचा त्रैमासिक आढावा घेईल. अशा प्रकरणांचा त्रैमासिक आढावा घेतल्यानंतर समिती आपला अहवाल राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समितीला पुढे पाठविल. समिती अपिल/ आवेदन/ प्रतिक्रिया/ लेखी निवेदन दाखल करण्यासाठी आणि न्यायालयाच्या आदेशांच्या अंमलबजावणीसाठी यथोचित यंत्रणेची देखील योजना करेल.

(३) समिती, कोणतीही कार्यवाही, परिच्छेदनिहाय अभिप्राय उत्तरादाखलचे प्रतिज्ञापत्र, अपिलासाठीचे प्रस्ताव सादर /दाखल करण्यात होणारा विलंब/ कसूर आदेशाच्या अंमलबजावणीतील निष्क्रियता / हलगर्जीपणा किंवा आदेशाची अंमलबजावणी न करण्यामागची कारणे , योग्य किंवा पूर्ण सूचना देण्याबाबत केलेली चूक, आवश्यक ते सर्व कागदपत्रे पुरविण्यास आलेले अपयश, प्रकरणांचा मागोवा घेण्यात मध्यस्त अधिकाऱ्यास आलेले अपयश, इत्यादिंची चौकशी करेल. राज्य सरकारला नुकसान झाले आहे, असे जर समितीच्या निदर्शनास

आले तर ती कारणांसहीत आपल्या लेखी अहवालाद्वारे राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीस कोणत्याही कारवाईची शिफारस करेल.

(४) समिती, राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीस प्रकरणांची चौकशी, निकाल आणि प्रलंबित प्रकरणे यांचा मासिक अहवाल सादर करील. ती समिती दहा वर्षे, पाच वर्षे आणि तीन वर्षापेक्षा जास्त जुन्या असणाऱ्या प्रकरणांचा स्वतंत्र मासिक प्रगती अहवाल सुद्धा सादर करील. समिती जुन्या प्रकरणांचा सातत्याने पाठपुरावा करील आणि संबंधित विभागास प्रकरणे लवकर निकालात काढण्यासाठी शिफारशी किंवा सूचना देईल.

(५) चारमाही तत्वावर, विभागाची अधिकार प्रदत्त समिती न चुकता, मुदतबाह्य, निष्फळ किंवा असफल प्रकरणांची यादी राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीस सादर करील. त्याचप्रमाणे, अधिकार प्रदत्त समिती, उच्च न्यायालयाच्या किंवा सर्वोच्च न्यायालयाच्या कोणत्याही पूर्व न्यायनिवाड्याअंतर्गत (आव्हान न दिलेल्या) सामावून घेतलेल्या प्रकरणांची सूची देईल. अशा उक्त न्यायनिवाड्यांतर्गत किंवा आदेशांतर्गत सामावून घेतलेल्या प्रकरणांच्या सूचीसाठी तडजोडीची शिफारस करील.

(६) समिती, राज्य सरकारला झालेल्या अदमासे नुकसानीचा अंदाज आणि त्या विषयाशी संबंधीत सविस्तर माहिती, दस्तऐवज, शेऱ्यांसह सरकारी वकीलाविरुद्धच्या तक्रारी/गाऱ्हाणी राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे पाठविल.

(७) कोणत्याही लवादाच्या नियुक्तीच्या पूर्वी, समिती, राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे अशा शिफारशी मंजुरीसाठी पाठविल.

(८) राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीने दिलेल्या निदेशांची, शिफारशींची किंवा सूचनांची अंमलबजावणी करणे हे समितीचे कर्तव्य असेल.

## ३.३ जिल्हा स्तरीय अधिकार प्रदत्त समिती

### ३.३.१ समितीची रचना (जिल्हा स्तर)

जिल्हा स्तरीय अधिकार प्रदत्त समितीचे अध्यक्ष जिल्ह्याचे दंडाधिकारी/ संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी असतील आणि इतर सभासदांमध्ये महानगर पालिकेच्या क्षेत्रातील पोलिस आयुक्त, जिल्हा पोलिस अधीक्षक, जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महानगर पालिकेचे आयुक्त, जिल्हा सरकारी वकील आणि जिल्ह्यातील सहायक अभियोग संचालक आणि शासनाच्या मुख्य सचिवांनी नामनिर्देशित केलेल्या सदस्यांसह आठपेक्षा जास्त नसतील इतक्या सदस्यांचा समावेश असेल. जिल्हा सरकारी वकील आणि जिल्हा सरकारी अभियोक्ता हे, अशा अधिकार प्रदत्त समितीचे सदस्य-सचिव असतील.

### ३.३.२ समितीची कर्तव्ये (जिल्हा स्तरीय)

(१) ही समिती जिल्हा स्तरावरील दाखल झालेल्या, निकालात काढलेल्या आणि प्रलंबित विवादांवर मासिक अहवाल सादर करील. समिती, शीघ्रतेने निकाल लावायची/निकालात काढावयाची आवश्यक असणारी अशी जुनी प्रकरणे किंवा लक्षवेधी प्रकरणे वेगळी काढेल आणि अशा प्रकरणांना उच्च प्राधान्य देऊन त्याचा पाठपुरावा करण्यासंबंधात सरकारी वकीलास निदेश देईल. प्रकरण परत्वे, विशिष्ट प्रवर्ग, वर्ग, गट किंवा विषयांचे विवाद किंवा प्रकरणे टाळणे, कमी करणे, कपात करणे, किंवा न्यून करणे या दृष्टीकोनातून, समिती राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीस सूचनांसह आपला विश्लेषणात्मक अहवाल सादर करील.

(२) समिती, स्वाधिकारे किंवा राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीच्या किंवा विधि व न्याय विभागाच्या विनंती वरुन, संभवत: अवर सचिव या दर्जापेक्षा निम्न दर्जाचा नसेल अशा विधि व न्याय विभागाच्या सक्षम अधिकाऱ्याद्वारे, प्रकरण परत्वे, विशिष्ट विषय, गट, क्षेत्र किंवा विभागाशी संबंधीत संपूर्ण फाईल किंवा फाईल्सची प्रत्यक्ष पडताळणी करील किंवा तशा पडताळणीची व्यवस्था करील. समिती संबंधित जिल्हा किंवा तालुक्याच्या फाईलिंमधील दस्तऐवजांच्या (कागदपत्रांच्या) उपलब्धतेची पाहणी करील किंवा तशा पाहणीची व्यवस्था करील.

(३) समिती, दर दोन वर्षांतून एकदा, प्रत्येक तालुका किंवा जिल्हा न्यायालयातील सरकारी वकीलांकडील सर्व उपलब्ध फाईल्सच्या पाहणीची व्यवस्था करील. अशा पाहणीचा अहवाल जिल्हा समितीच्या पुढे मांडण्यात येईल, जी पुढे अशा पाहणीच्या अहवालाचा मतितार्थ राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समिती पुढे सादर करेल.

(४) ज्यामध्ये न्यायालयांनी, सामाईक त्रूटी, दोष, विसंगती किंवा चूका दर्शवून देणारे निदेश/न्यायनिर्णय/आदेश दिले आहेत हे लक्षात घेऊन भविष्यातील तत्सम विवाद टाळण्यासाठी, समिती अशा प्रकरणांचे त्रैमासिक पुनर्विलोकन करील. अशा प्रकरणांचे त्रैमासिक पुनर्विलोकन केल्यानंतर, समिती आपला अहवाल राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे पाठविल.

(५) शासनाविरुध्द झालेला न्यायालयाचा आदेश ज्यामध्ये कोणताही प्रतिकूल शेरा, सरकारवर लादण्यात आलेला फिर्यादीचा खर्च किंवा दंड, त्याचप्रमाणे शासनाच्या हलगर्जीपणा बाबत घेतलेली दखल अशा प्रकरणांचे समिती दरमहा पुनर्विलोकन करील. या संदर्भात समिती मध्यस्त अधिकाऱ्याच्या अहवालानुसार कारवाई करेल. मध्यस्त अधिकाऱ्याचा अहवाल प्राप्त झाल्यावर, समिती जबाबदारी निश्चित करण्याची व्यवस्था करेल आणि आपल्या शिफारशी तसेच सूचना असल्यास, पुढील कारवाईसाठी राज्य स्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे अहवाल पाठवेल.

(६) राज्य स्तरावर अधिकार प्रदत्त समितीचे निदेश, शिफारशी किंवा सूचनांची अंमलबजावणी करणे, हे समितीचे कार्य असेल.

## ३.४ मध्यस्त (नोडल) अधिकारी

### ३.४.१ मध्यस्त (नोडल) अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या

शासनाचे विभाग व शासकीय खटला (अभियोग) चालविणारी अभिकरणे यांना सामोरे जावे लागणाऱ्या अडचणींना तोंड देण्यासाठी आणि त्यांच्यामधील योग्य समन्वयासाठी शासनाचा प्रत्येक विभाग, अवर सचिवाच्या दर्जापेक्षा कमी नसलेल्या किमान एका मध्यस्त अधिकाऱ्याची नियुक्ती करील. नियुक्त करावयाचा मध्यस्त अधिकारी हा विधि पदवीधर असेल आणि त्याला उच्च न्यायालयातील व दुय्यम न्यायालयातील न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याचा किमान ३ वर्षांचा अनुभव असेल.

मध्यस्त अधिकाऱ्याला कायद्यातील अलीकडील घडामोडींसह अद्ययावत माहिती मिळावी यासाठी कायद्याची पुस्तके, जर्नल्स, सॉफ्टवेअर, कायद्यावरील साहित्य यांसह सर्व मूलभूत सुविधा त्याला पुरविण्यात याव्यात. विभागाची सर्व विधिविषयक प्रकरणे मध्यस्त अधिकाऱ्यांमार्फत

पाठविण्यात यावीत, यामध्ये अभिप्रायासाठी विधि व न्याय विभागाकडे निर्दिष्ट करावयाच्या प्रकरणांचा देखील समावेश असेल.

### ३.४.२ मध्यस्त (नोडल) अधिकाऱ्याची कर्तव्ये

(१) मध्यस्त अधिकारी क्रियाशील प्रकरण व्यवस्थापनासाठी जबाबदार असेल. तो न्यायालयासमोर प्रलंबित असणाऱ्या प्रकरणांचे सातत्याने व्यवस्थापन करील आणि प्रकरणे विषयाशी सुसंगत नाहीत किंवा त्यांस अनावश्यक विलंब करण्यात येत आहे किंवा कसे याबाबत देखील तो तपासणी करेल. प्रक्रियेला वेग देण्यासाठी आणि इच्छित परिणाम साधण्यासाठी, शासनाचे विभाग व शासकीय अधिवक्ता यांच्यामध्ये जोडणारा परिणामकारक दुवा व तत्पर अधिकारी म्हणून तो कार्य करील.

(२) विभागाचे अधिकारी व शासकीय अधिवक्ते यांच्याशी विचारविनिमय केल्यानंतर लेखी वादकथनचा (pleadings) मसुदा तो तयार करील आणि योग्य वादप्रतिवाद लिहून काढण्यासाठी आणि न्यायालयासमोर युक्तिवाद करण्यासाठी आवश्यक असलेली सर्व माहिती व कागदपत्रे तो पुरवील. मध्यस्त अधिकारी, शासनाद्वारे किंवा शासनाविरुद्ध सुरु करण्यात आलेल्या दाव्याचा किंवा इतर कार्यवाहीचा मसुदा अतिशय अचूकपणे आणि सुस्पष्टपणे तयार करण्यात आलेला आहे हे पाहील. शासकीय अधिवक्त्यांशी विचारविनिमय करुन संपूर्ण माहिती देणारे सर्व आवश्यक कागदपत्र न्यायालयाला उपलब्ध करुन देण्यात आले आहेत याची तो खात्री करुन घेईल. एकतर वस्तुस्थिती कथनात किंवा ज्यावर राज्याचा खटला आधारित आहे त्या कारणांमध्ये पुनरुक्ती झालेली नाही याची खात्री तो करुन घेईल. महत्वाची तथ्ये व कारणे योग्यरित्या ठळकपणे अधोरेखित केली आहेत आणि प्रकरण प्रस्तुत करताना कोणतीही बाब सुटलेली नाही याकडे देखील तो लक्ष देईल.

(३) न्यायालयीन कामकाजास तो नियमितपणे उपस्थित राहील आणि विभाग प्रमुखाला, न्यायालयापुढे चालणाऱ्या खटल्यांच्या प्रगतीबाबत कळवील. प्रलंबित खटले, कार्यवाहीचे टप्पे, बाबी कोणत्याही असल्यास, सुनावणीसाठी तो सूचिबद्ध करील, निर्णय कोणताही असल्यास, तो कळवील आणि खटल्यामधील निर्णयानुसार करण्यात आलेल्या उपाययोजना याविषयीचा मासिक अहवाल तयार करील.

(४) विभागाशी संबंधित न्यायालयाच्या प्रत्येक कामकाजाचा सुयोग्य अभिलेख तो ठेवील.

(५) न्यायालयाने त्यांच्या आदेशात किंवा न्यायनिर्णयात किंवा सद्दश बाबतीत कोणतेही निदेश, प्रतिकूल शेरे, निरीक्षणे, दर्शविलेले भिन्नमत किंवा असमाधान, याबाबतचा तो अहवाल देईल. कार्यपद्धती विषयक विलंब व वारंवार होणाऱ्या तहकूबी याविषयी पुरेशा तपशीलासह तो अहवाल देईल.

## ४. शासनाचे प्रतिनिधित्व

### ४.१ सरकारी वकील/अधिवक्ते यांची नियुक्ती करणे आणि त्यांना अधिक चांगल्या साधनांनी सुसज्ज करणे

(एक) सरकारी अधिवक्ते/अभियोक्ते यांची निवड प्रक्रिया निश्चित करणे आणि प्रख्यात, लौकिक असलेल्या, सचोटीच्या व चारित्र्याच्या अधिवक्त्यांची राज्य शासनाचे प्रतिनिधित्व करण्यासाठी निवड करण्यात आली आहे, याची खातरजमा करुन घेणे आवश्यक आहे.

(दोन) शासकीय नामिका (panel) वकील वर्गामधील विभिन्न प्रवर्गांना व्यापक संधी देणारी असली तरी अशा शासकीय नामिकांमध्ये फक्त सक्षम व कार्यतत्पर व्यक्तींचा समावेश असेल. शासकीय नामिकेध्ये समावेश करण्यासाठी जर एखाद्या व्यक्तीने नावाची शिफारस केली तर त्या व्यक्तीने अशावेळी खबरदारी घेण्याची गरज आहे आणि ज्यांची शिफारस करण्यात येत आहे त्यांची विश्वासार्हता मुख्यत्वेकरुन कायद्याचे ज्ञान व सचोटी याबाबत त्यांनी तपासणी केली असली पाहिजे.

(तीन) निवड प्रक्रियेमध्ये, सक्षमता, कार्यक्षेत्रातील नैपुण्य आणि विभिन्न विधिशाखांमधील व्यासंगी या बाबींवर भर देऊन शासकीय नामिकेवर नियुक्ती होण्यासाठी इच्छूक आहेत अशा उमेदवारांचे कौशल्य व क्षमता लक्षात घेण्यात येईल.

(चार) शासकीय अधिवक्ते सुसज्ज असले पाहिजेत व त्यांना पुरेशा मुलभूत सुविधा पुरविण्यात आल्या पाहिजेत. संगणक, आंतरजाल जोडणी (Internet Units) इत्यादिंसारख्या आधुनिक तंत्रज्ञानासह व इतर मुलभूत सुविधा शासकीय विवाद चालविणाऱ्या एजन्सीजना पुरविण्यासाठी प्रयत्न केले जातील.

(पाच) सरकारी अधिवक्त्यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम, चर्चासत्रे, कार्यशाळा, उजळणी पाठ्यक्रम यांस प्रोत्साहन देण्यात येईल. विशेषकरणाची क्षेत्रे निश्चित करुन त्यात सुधारणा करण्यावर विशेष भर देण्यासह सरकारी वकीलांसाठी निरंतर कायदेविषयक शिक्षण चालू ठेवण्यात येईल. प्रशिक्षण कार्यक्रम नियमित कालांतराने/ जसे आणि जेव्हा आवश्यक असतील तेव्हा आयोजित करण्यात यावेत आणि यासाठी जेव्हा जेव्हा गरज भासेल तेव्हा तेव्हा इतर सर्व विभागांकडून आवश्यक ते सर्व सहकार्य व मदत देण्यात येईल.

(सहा) शक्य असेल तेथवर आणि व्यवहार्य असेल तेथवर टाचणाचे (Briefs) समन्याय वितरण करावे जेणेकरुन तेथे शासनाचे प्रतिनिधित्व व्यापक पायावर आधारलेले असेल. यामध्ये महाअधिवक्ता, सरकारी वकील व सरकारी अभियोक्ता लक्ष घालतील आणि त्यांना योग्य वाटेल त्याप्रमाणे विशेष काळजी घेतील.

(सात) सरकारी वकीलांनी न्यायालयाप्रती तसेच शासनाप्रती जबाबदारीच्या जाणिवेने त्यांची कर्तव्ये पार पाडणे अपेक्षित आहे. वस्तुस्थितीच्या किंवा कायद्याच्या मुद्यांवरुन सहमती /सवलती देण्यात आल्या आणि अशा सहमती/सवलती देणे हे समर्थनीय नव्हते, असे आढळून आल्यास ही बाब अधिकार प्रदत्त समितीला कळविण्यात यावी आणि उपाय स्वरुप शिक्षात्मक कारवाई करण्यात यावी.

(आठ) सचिव, वरिष्ठ अधिकारी, मंजुरी अधिकारी, आयुक्त, अन्न व औषधी द्रव्ये विभाग, स्थानिक आरोग्य प्राधिकारी, औषधी द्रव्ये व सौंदर्य प्रसाधने अधिनियमाखालील प्राधिकारी, निरनिराळया राष्ट्रीय व राज्य प्रयोगशाळांतील शास्त्रज्ञ, अधिकारी, डॉक्टर्स, निरनिराळया क्षेत्रांतील तज्ञ व्यक्ती, विश्लेषक, अन्वेषण अधिकारी, तुरुंग प्राधिकारी, निरनिराळया शाळा, महाविद्यालये व विद्यापीठातील अधिकारी इत्यादि यासारख्या साक्षीदारांच्या व्हिडीओ कॉन्फरन्सिंगद्वारा तपासणी करण्यासाठी सरकारी वकील किंवा अभियोक्ता यांनी संपर्क अधिकारी म्हणून कार्य करणे आवश्यक आहे. सध्या व्हिडीओ कॉन्फरन्सिंगची सुविधा ही, प्रत्येक जिल्हा न्यायालय, प्रत्येक जिल्हाधिकाऱ्याचे कार्यालय आणि महाराष्ट्र राज्यातील बहुसंख्य मध्यवर्ती कारागृहात उपलब्ध आहे. अशी काही इतर ठिकाणे आहेत जेथे राष्ट्रीय

माहिती आयोगाद्वारे व्हिडीओ कॉन्फरन्सिंगची सुविधा उपलब्ध करुन दिली आहे. म्हणून, सरकारी वकील किंवा अभियोक्ता हे तपासणीचे दिनांक निश्चित करण्याच्या प्रयोजनार्थ अशा साक्षीदारांशी बोलू शकतील. न्यायालयाच्या परवानगीने अभियोक्ता किंवा सरकारी वकील हे, अशा साक्षीदारांना सर्व आवश्यक कागदपत्रे आगाऊ उपलब्ध करुन देऊ शकतात. या प्रयोजनार्थ, असे आवश्यक आहे की, सरकारी वकील किंवा अभियोक्ते यांना माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन योग्य आंतरसंवादाची (इंटरफेसची) तरतूद करुन देण्यात यावी आणि त्यांना अशा अधिकारी व साक्षीदार यांच्याशी वेळेअगोदरच संपर्क साधण्यासाठी आवश्यक तो तपशील देण्यात यावा.

## ५. तहकुबी (Adjournments)

अनावश्यक स्थगिती / तहकुबी टाळण्यासाठी, माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन, शासकीय विभाग व सरकारी वकील यादरम्यान योग्य आंतरसंवादाची (इंटरफेस) तरतूद करण्याचा राज्य शासन विचार करील. अशा आंतरसंवादाचा (इंटरफेस) वापर करुन, शासकीय विभागाला सरकारी वकील किंवा मध्यस्त अधिकारी यांच्यासोबत, कोणतीही माहिती, संदेश, कागदपत्रे, मसुदे आणि आदेश इत्यादि यांची देवाणघेवाण करणे शक्य होईल. जिल्हा न्यायालय, उच्च न्यायालय आणि सर्वोच्च न्यायालय यांच्या प्रकरण माहिती प्रणालीवर यापूर्वीच उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचा सर्व संबंधितांना , वेळोवेळी न्यायालयीन दाव्यासंबंधातील दैनंदिन कार्यवाही व घडामोडी या संबंधातील माहिती घेण्याकरिता वापर करता येईल. ही प्रक्रिया विलंब कमी करु शकेल व वारंवार घेण्यात येणारी तहकुबी कमी होऊ शकेल.

मध्यस्त अधिकारी व सरकारी अधिवक्ता हे शासनामार्फत अनुपालन, कसूर/ हलगर्जीपणा किंवा निवेदन या कारणांसाठी न्यायालयीन प्रकरण अनावश्यकरित्या स्थगित केले जात नाही याची खात्री करुन घेतील.

## ६. अपीले / पुनरीक्षणे दाखल करणे

अंतरिम एकतर्फी आदेशांच्याविरुध्द अपील दाखल करण्यापूर्वी एकतर्फी आदेश रद्द करण्याकरिता एखादा अर्ज दाखल करणे योग्य ठरेल किंवा कसे याचा साकल्याने विचार करण्यात येईल. केवळ अपवादात्मक परिस्थितीमध्ये अपील किंवा पुनरीक्षण अर्ज यांचा अवलंब करण्यात येईल. न्यायाधिकरणांकडे जाणे हा नेहमीचा परिपाठ असू नये, त्याऐवजी जेव्हा अपरिहार्य असेल तेव्हाच न्यायाधिकरणांचा अवलंब करण्यात येईल. कोणत्याही मोठया प्रतिफलिताशिवाय जेथे व्यक्तीगत गाऱ्हाणी व निवृत्तीवेतन संबंधातील बाबी असतात अशा सेवांच्या बाबींमध्ये शक्य असेल तेथवर, न्यायालयात जाणे टाळण्यात यावे. कर्मचाऱ्यांच्या एका घटकाचा दुसऱ्या घटकाविरुध्द बाजू उचलून धरण्याच्या कारणास्तव अपीलाच्या उपाययोजनेचा अवलंब करण्यात येणार नाही.

### ६.१ अपील दाखल करण्यात विलंब

न्यायालयाने दिलेल्या अंतिम किंवा अंतरिम निर्णयाबाबत कोणताही वेळ न धालवता, संबंधित विभागाला सरकारी अधिवक्त्याने माहिती कळविणे आवश्यक असेल. माहिती देण्याकरिता संसूचनेच्या नेहमीच्या रुढीगत पध्दतीशिवाय, सरकारी अधिवक्त्याला माहिती तंत्रज्ञान आधारित संदेश पध्दतीचा स्विकार करण्याची विनंती करण्यात यावी. कारण त्यामुळे वेळ वाचेल आणि अपील

दाखल करण्याच्या प्रयोजनार्थ आवश्यक असेलेले अभिमत मागविण्यासाठी संबंधित शासकीय विभागाला जादा वेळ मिळू शकेल.

वादाच्या स्वरुपाच्या आधारे, पुढील कार्यवाहीकरिता किमान वेळ निश्चित केला जाईल ज्यामध्ये खालच्या न्यायालयाचा न्यायनिर्णय आदेशाला आव्हान देण्याकरिता , संबंधित शासकीय विभागाला स्वत:च हालचाली कराव्या लागतील. दिलेल्या वेळेत कार्यवाही करण्यात कसूर झाल्यास विभाग स्तरावरील अधिकार प्रदत्त समितीसमोर अशा कसूर असलेल्या कारणांचे स्पष्टीकरण देणारा लेखी अहवाल दाखल करणे हे संबंधित विभागाच्या मध्यस्त अधिका-याचे कर्तव्य असेल. वादातील घडामोडी, देण्यात आलेले आदेश यावर लक्ष ठेवण्यासाठी, सदर विभाग, माहिती तंत्रज्ञानाच्या सुविधांचा वापर करील.

विलंबाच्या माफीसाठी करावयाचा अर्ज हा योग्य निदेश, आधारभूत कागदपत्रे यासोबत विलंबाकरिता असलेल्या कारणांच्या तपशीलासह तयार करण्यात येईल. विलंबासंबंधात योग्य स्पष्टीकरण देण्यात आले आहे आणि अर्जात नमूद केलेल्या तपशीलासंबंधात माहिती असणाऱ्या संबंधित व्यक्तींकडून अर्ज प्रतिज्ञेवर सादर करण्यात आला आहे याची मध्यस्त अधिकारी खात्री करुन घेईल.

## ७. पर्यायी तंटा निवारण यंत्रणा (ADR)

ज्या ज्या दाव्यांमध्ये राज्य शासन हे पक्षकारांपैकी एक पक्षकार असते त्याबाबतीत, पर्यायी तंटा निवारण यंत्रणेमार्फत ते सोडविण्यासाठी प्रयत्नांची शिकस्त करील. प्रत्येक विभाग स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती आणि जिल्हा स्तरावरील अधिकार प्रदत्त समिती, सर्वाधिक चांगल्यारितीने पर्यायी तंटा निवारण यंत्रणेचा वापर करण्याच्या प्रयोजनार्थ सर्व प्रकरणांचे पुनर्विलोकन करील. याबाबत विचार करताना, कायद्याची यापूर्वीच निश्चित केलेली स्थिती किंवा निर्णय घेण्यात आलेली प्रकरणे यांचा मार्गदर्शक प्रणाली म्हणून वापर करता येईल. राज्य विवाद धोरणाच्या प्रसिध्दीच्या दिनांकापासून साधारणत: तीन महिन्यांच्या आत पुनर्विलोकनाचे काम पूर्ण करावयाचे आहे. अशा प्रकरणांची यादी, राज्यस्तरावरील अधिकार प्रदत्त समिती समोर शीघ्रतेने निकालात काढण्याकरिता ठेवण्यात येईल. विभाग स्तरीय समिती यथास्थिती, जिल्हास्तरीय समिती, पर्यायी तंटा निवारण यंत्रणा , लोक अदालत, विशेष मोहीम, सकाळची / सायंकाळची न्यायालये, विशेष न्यायालये किंवा न्यायाधिकरणे इत्यादिंकरिता असलेली धोरणे, यांचा वापर करुन प्रकरणे निकालात काढण्यासाठी असलेले मार्ग व साधने सुचवू शकेल. विभागाच्या स्तरावरील समिती ही, राज्य स्तरावरील अधिकार प्रदत्त समितीच्या पूर्व मान्यतेने विशिष्ट पध्दतीच्या प्रकरणांच्या तडजोडीचे प्रयत्न करण्यासाठी आपले अधिकारी निश्चित करेल तसेच समझोत्याच्या अटी व शर्ती यांचे प्रपत्र निश्चित करील.

त्याचप्रमाणे " तंटामुक्ती अभियान" याला चालना देण्यात यावी कारण त्यामुळे संभाव्य विवाद रोखून धरण्यासाठी शासनाला सहाय्य झाले आहे आणि गावांमध्ये शांतता व ऐक्य राखण्याकरिता, कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेससुध्दा मोठया प्रमाणात मदत झालेली आहे. जुजबी तंटा म्हणून सुरु होणारी भांडणे जी अदखलपात्र गुन्हा किंवा गौण अपराध म्हणून पोलीस ठाण्यापर्यंत पोहोचतात अशा जुजबी तंटयांचा विवादपूर्व प्रकरणे म्हणून अंदाज घेण्यासाठी प्रयत्न करण्यात येतील. पक्षकारांचे वाद स्थानिक स्तरावर मिटविणाऱ्या मंचासाठी फिरत्या वाहनांचा वापर केला

जाईल, जेणेकरुन आवश्यक असेल तर बांध, अंतर्गत रस्ते, यासंबंधांतील लहान तंटे व त्यासारखे विषय त्या ठिकाणांना भेटी देऊन निकाली काढता येतील.

दिवाणी प्रक्रिया संहितेच्या कलम ८० अन्वये नोटीस प्राप्त झाल्यानंतर, संबंधित प्राधिकारी संबंध्द विधि, नियम व मार्गदर्शक सूचना यानुसार शक्य तितक्या शीघ्रतेने त्या बाबीसंबंधात निर्णय घेईल. जर सदर प्राधिकाऱ्याला समझोला केला जाईल असा एखादा घटक आहे असे आढळून आले तर, पर्यायी तंटा निवारण यंत्रणेचा स्विकार करण्याकरिता सदर प्रकरण निर्णयार्थ पक्षकाराला सूचित करुन विभाग स्तरीय अधिकार प्रदत्त समितीकडे निर्दिष्ट करण्यात येईल. ज्या प्रकरणांमध्ये याबाबत निश्चित निर्णय घेण्यात आला नाही आणि पक्षकार, राज्य शासनाने किंवा विशिष्ट प्राधिकरणाने लवकर निर्णय घ्यावा असे निदेश देण्याची विनंती करण्यासाठी न्यायालयात गेला तर अधिकार प्रदत्त समिती अशा प्रकरणांचा आढावा आणि पर्यायी तंटा निवारण पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी योग्य प्रकरणांचा गांभीर्यपूर्वक विचार करील. त्याचप्रमाणे, याचिकेसोबत दाखल केलेले प्रकरण शीघ्र निर्णयार्थ पाठवले आहेत का याचाही विचार करील.

## ८. विशेषीकृत वाद

अशी प्रकरणे ज्या मध्ये प्रकल्प रोखून ठेवण्यात आलेले आहेत तेथे जनहित विचारात घेऊन प्रभावीपणे बचाव करावयाचा आहे. यासंबंधात यथाशिघ्र कार्यवाही करुन सदर प्रकरणे निकाली काढण्यात आली पाहिजेत. विविध कायदे,नियम आणि विनियमांची वैधता आक्षेपित केली आहे अशा सर्व प्रकरणांमध्ये परिनियम किंवा विनियम यांच्यातील तर्कसंगतीबाबत कारणमीमांसा स्पष्टकरणारी योग्य ती प्रतिज्ञापत्रे सादर करण्यात यावीत आणि त्यांच्या वैधानिक सक्षमतेच्या संबंधाने समुचित निश्चित विधाने/ठाम विधाने देखील करण्यात यावीत.निविदा किंवा करारासंदर्भात उद्भवणाऱ्या प्रकरणांचा संविधानात्मक अत्यावश्यकता आणि सुशासन या गोष्टी विचारात घेऊन योग्यपणे बचाव करण्यात येईल.

## ९. जनहित याचिका

जनहित याचिकांच्या बाबतीत संतुलित दृष्टीकोन असला पाहिजे. शासनाला गैरसोयीची असणारी गोष्ट न्यायालयाला करु दे म्हणून, जनहित याचिकेकडे कोणी पाहू नये. दाखल करण्यात आलेल्या बऱ्याचशा जनहित याचिका प्रसिद्धीसाठी आणि त्रयस्थ पक्षकाराने सांगितल्यावरुन दाखल केलेल्या आहेत आणि त्या सद्भावपूर्वक दाखल केलेल्या नाहीत व त्या जनहित याचिका नाहीत हे उघड केलेच पाहिजे. सार्वजनिक करार/ठेके यांना आव्हान देणाऱ्या जनहित याचिका गांभीर्याने बचाव घेऊन लढण्यात याव्यात. असे प्रकल्प थांबविणारे अंतरिम आदेश काढण्यात आले असतील आणि , जनहित याचिका फेटाळली गेली तर मात्र नुकसानभरपाई देण्यासाठी याचिकाकर्त्यावर, योग्य त्या अटी/ शर्ती लादण्यासाठी न्यायालयाला विनंती केलीच पाहिजे.

## १०. सार्वजनिक क्षेत्र उपक्रम विषयक वाद

सार्वजनिक क्षेत्र उपक्रमांमध्ये परस्परांत वाद टाळण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केलेच पाहिजेत. सार्वजनिक क्षेत्र उपक्रमाच्या सर्वोच्च प्राधिकाऱ्यांना हे समजावून सांगितले पाहिजे की त्यांनी प्रथमत: पर्यायी तंटा निवारण पद्धतीचा स्वीकार करावा जी कमी खर्चिक व वाद टाळणारी आहे. मात्र

करारांमधील अटी व शर्ती तसेच लवादाच्या अटी निश्चित करीत असतांना अत्यंत काळजी घेणे आवश्यक असल्याचे त्यांना सांगण्यात यावे. प्रत्येक सार्वजनिक क्षेत्र उपक्रमाची विभागस्तरीय अधिकार प्रदत्त समिती राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीला आपला अहवाल सादर करील. सार्वजनिक क्षेत्र उपक्रमाची विभागस्तरीय अधिकार प्रदत्त समिती, आवश्यक असल्यास, राज्यस्तरीय अधिकार प्रदत्त समितीशी विचारविनिमय करुन, लवादाची नियुक्ती करण्याचा निर्णय घेईल.

## ११. जलदगती न्यायालये

केंद्र सरकार पुरस्कृत योजनेअंतर्गत जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आल्यामुळे सत्र न्यायालयांमधील न्यायालयीन चौकशीयोग्य प्रकरणे मोठ्या प्रमाणात कमी झाली आहेत. राज्य शासनाने ही योजना पुढील पाच वर्षांसाठी राज्य निधीतून सुरु ठेवण्याचा निर्णय या आधीच घेतला आहे. सत्र न्यायालयात चालविण्यात येणाऱ्या अपराधांसाठी जलदगती न्यायालये स्थापन करण्याची तरतूद विद्यमान योजनेत करण्यात आली आहे. दंडाधिकारी न्यायालयांमध्ये मोठ्या प्रमाणात प्रलंबित असलेली फौजदारी प्रकरणे लक्षात घेता, मुंबई शहरातील महानगर दंडाधिकाऱ्यांच्या न्यायालयांमधील आणि राज्याच्या अन्य भागातील न्यायिक दंडाधिकारी न्यायालयांमधील प्रलंबित प्रकरणे शीघ्रतेने निकाली काढण्यासाठी जलदगती न्यायालये स्थापन करण्याकरिता एक योजना तयार करण्यात येईल.

वैज्ञानिक पद्धती मनावर ठसविण्याबरोबरच 'व्हिडिओ कॉन्फरन्सिंग' व इतर तंत्रज्ञानाचा नियमित वापर तसेच 'व्हिडिओ कॉन्फरन्सिंगद्वारा गतीमान व योग्य न्यायचौकशी तसेच न्यायचौकशी अधीन कैद्यांच्या शीघ्रगती न्यायचौकशीमधील अन्य सुधारणात्मक उपाययोजना असेल. ज्या साक्षीदारांची उपस्थिती, त्याला नेमून दिलेल्या कामाच्या स्वरुपानुसार व त्याच्या पदस्थापनेच्या ठिकाणी अनिवार्य आहे, अशा, काही विशिष्ट साक्षीदारांच्या तपासणीमध्ये 'व्हिडिओ कॉन्फरन्सिंग'चा वापर केवळ विलंब टाळण्यासाठीच नव्हे तर संबंधित साक्षीदाराला त्याच्या कामाच्या ठिकाणी त्याची प्राथमिक कर्तव्ये पार पाडण्यास सहाय्यभूत ठरावे, या दोन्ही बाबींसाठी सारखेच गरजेचे आहे. न्यायचौकशीअधीन कैद्यांच्या प्रकरणात 'व्हिडिओ कॉन्फरन्सिंग'चा वापर करणे ही काळाची गरज आहे.

काही विशेष प्रकारच्या प्रकरणांना संवेदनशीलपणे हाताळण्याची गरज आहे. अशा गरजा लक्षात घेऊन, अशा प्रकरणांच्या विशेष प्रवर्गासाठी विशेष न्यायालयांची स्थापना करता येऊ शकेल. त्याचप्रमाणे राष्ट्रीय विवाद धोरणामधील ध्येय लक्षात घेऊन, ३ वर्षांपर्यंतच्या जुन्या प्रकरणांसाठी, राज्य शासन न्यायाधीशांची बहुसंख्येने नियुक्ती करण्याचे व त्यांच्या गरजांनुसार पर्याप्त पायाभूत सुविधा पुरविण्याचे सर्वतोपरी प्रयत्न करील.

## १२. नियमित न्यायालयाव्यतिरिक्त विशेष न्यायालये, न्यायाधिकरणे व प्राधिकरणे यांच्यापुढे प्रलंबित असलेली प्रकरणे निकालात काढण्यासाठी उपाययोजना

विविध न्यायाधिकरणे, न्यायिकवत् प्राधिकरणे आणि ज्यांना विविध अधिनियम, नियम व विनियम यांअन्वये न्यायनिर्णय देण्याचे व ठरविण्याचे अधिकार दिलेले आहेत असे अधिकारी यांच्याकडे विवादांचा तत्सम मोठा भाग प्रलंबित आहे. म्हणून, राज्य विवाद धोरण ठरवितांना, अशा प्रकारचे विवादही लक्ष देण्यायोग्य आहेत. निर्णय घेण्याच्या दृष्टीने, अशी न्यायाधिकरणे, न्यायिकवत्

